महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील अधिकाऱ्यांना महिला व बाल विकास विभागाकडील बाल विकास प्रकल्प अधिकारी, गट-ब पदावरुन वर्ग करुन ग्राम विकास विभागांतर्गत पदावर पदस्थापना देण्याबाबत - औरंगाबाद विभाग

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांकः मविसे १०/२०१४/प्र.क्र. ७८/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई-४०० ००१
तारीख: २१ मे, २०१५

संदर्भ:-

१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांकः मविसे १०/प्र.क्र.१०४(क)/ २०११/आस्था-३(अ), दिनांक ३ ऑगस्ट, २०१२

**आदेश:-**

उपरोक्त संदर्भीय शासन निर्णयान्वये, बाल विकास प्रकल्प अधिकारी, गट-ब ची ४४९ पदे टप्प्या टप्प्याने महिला व बाल विकास विभागाकडे हस्तांतरीत करण्याबाबत निर्णय घेण्यांत आला आहे. त्यानुसार औरंगाबाद विभागातील बाल विकास प्रकल्प अधिकारी, गट-ब पदावर कार्यरत असणाऱ्या महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील खालील नमूद अधिकाऱ्यांना ग्राम विकास विभागाकडे वर्ग करुन त्यांना समुपदेशनाने स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या ग्राम विकास विभागाअंतर्गत पदावर पदस्थापना देण्यांत येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद व ठिकाण | ग्राम विकास विभागांतर्गत समुपदेशनाने देण्यात आलेले नियुक्तीचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.यु.डी.तोटावाड | बाल विकास प्रकल्प अधिकारी, नांदेड, जिल्हा नांदेड | सहाय्यक गट विकास अधिकारी (रोहयो), जिल्हा परिषद, नांदेड | रिक्त पदी |

२. संबंधित अधिकाऱ्यांने त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन

पदस्थापना रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पदस्थापना दिलेल्या वरील नमूद अधिकाऱ्याला त्याच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्याच्या सूचना द्याव्यात.

४. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२११०४८२५९१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra Namdev Patil

Digitally signed by Ravindra Namdev Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ravindra Namdev Patil
Date: 2015.05.21 14:34:35 +05'30'

**(रविंद्र पाटील)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग
४. मा.प्रधान सचिव, ग्रामविकास व पंचायत राज
५. मा. मंत्री ग्रामविकास यांचे खाजगी सचिव
६. मा.आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), नागपूर
८. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड
१०.वित्त विभाग (अर्थसंकल्प-३ / वित्तीय सुधारणा / सेवा-९ / व्यय-१५) मंत्रालय, मुंबई
११.निवड नस्ती.